रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
शासन निर्णय, क्र.रेशीम-१६१०/प्र.क्र.२०२/रेशीम कक्ष
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: **२५ नोव्हेंबर, २०१०**

वाचा:- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक:रेशीम-१६२००१/प्र.क्र.१३/रेशीम कक्ष दिनांक ११ सप्टेंबर, २००१.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक:रेशीम-१६२००१/प्र.क्र.१३/रेशीम कक्ष, दिनांक ३१ जुलै, २००८.

३) संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र.रेशीम/कार्या-७/कोष खरेदी दर /१०/६८१७, दि.१८ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना:-:-**शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या रेशीम कोषांना योग्य भाव मिळावा व खाजगी व्यापाऱ्यांकडून त्यांची पिळवणूक होऊ नये यासाठी शासनाने कोष खरेदीचे आधारभूत दर ठरविण्यासाठी कोष खरेदी दर निर्धारण समितीची स्थापना दिनांक ११ सप्टेंबर २००१ च्या शासन निर्णयान्वये मा.प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आली असून सदर समितीची पुनर्रचना दिनांक ३१ जुलै २००८ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

२. सन २०१०-११ या वर्षासाठी रेशीम कोष खरेदीचे आधारभूत दर ठरविण्यासाठी सदर समितीची बैठक दिनांक २९.७.२०१० रोजी घेण्यात आली. सदर बैठकीमध्ये रेशीम उद्योगाला चालना देण्यासाठी काय उपाय संभव आहेत त्याचा अभ्यास करण्यासाठी समिती नेमण्यात यावी असा निर्णय घेण्यात आला आहे. या संदर्भात समिती गठण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** कोष दर खरेदी समितीच्या दि.२९.७.२०१० रोजी बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| १) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर | अध्यक्ष |
| २) उप संचालक (निरीक्षण),प्रादेशिक कार्यालय, केंद्रीय रेशीम मंडळ, मुंबई. | सदस्य |
| ३) श्री. सादिक जमा, सहायक संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,नागपूर | सदस्य |
| ४) श्री. संदीप प्रभाकर ढेरे - शेतकरी प्रतिनिधी मु.पो.पाडळीआळे, जि.अहमदनगर | सदस्य |
| ५) श्री.भरतभाऊ रानरुई - शेतकरी प्रतिनिधी मु.पो.पंढरपूर, जिल्हा सोलापूर | सदस्य |
| ६) श्री. सचिन भानुदासराव थोरात - रिलर रा.नेकनूर, ता.जि. बीड | सदस्य |
| ७) श्री. संतोष भागवत खंडागळे - रिलर रा.मंचर, ता. आंबेगाव, जिल्हा पुणे. | सदस्य |
| ८) उप संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर | सदस्य सचिव |

२.	रेशीम उद्योगाचा विकास कसा करता येईल यासंबंधी कोणत्या उपाययोजना करता येतील याबाबत समितीने शासनास शिफारशी कराव्यात. समितीने शिफारशीसह आपला अहवाल ६० दिवसांच्या आत शासनास सादर करावा.

३.	समितीच्या पदाधिकाऱ्यांना प्रचलीत नियमानुसार दैनिक भत्ता व प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील. त्यासाठी होणारा खर्च, संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर अंतर्गत प्रवास खर्चासाठी केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०११२६१५४६३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्र. बा. कडवे)
अवर सचिव , महाराष्ट्र शासन,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रति:-

१.	मा. मंत्री (वस्त्रोद्योग)/मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव.
२.	प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
३.	महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ ऑडीट), मुंबई
४.	महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता / ऑडीट), नागपूर
५.	वरीष्ठ उप महालेखापाल (पडताळणी), बाहय लेखापरिक्षा विभाग (नागरी), मुंबई
६.	संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, द्वारा महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., उमरेड रोड, नागपूर-९
७.	उप संचालक (निरीक्षण),प्रादेशिक कार्यालय, के.रे.मंडळ, मुंबई.
८.	श्री. सादिक जमा, सहायक संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय,नागपूर
९.	.श्री. संदीप प्रभाकर ढेरे - शेतकरी प्रतिनिधी मु.पो.पाडळीआळे, जि.अहमदनगर
१०..	श्री.भरतभाऊ रानरुई - शेतकरी प्रतिनिधी मु.पो.पंढरपूर, जिल्हा सोलापूर
११.	श्री. सचिन भानुदासराव थोरात - रिलर रा.नेकनूर, ता.जि. बीड
१२.	श्री. संतोष भागवत खंडागळे - रिलर रा.मंचर, ता. आंबेगाव, जिल्हा पुणे.
१३.	उपसंचालक तथा सदस्य सचिव, रेशीम संचालनालय, द्वारा महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, उमरेड रोड, नागपूर-९
१४.	उप संचालक, रेशीम संचालनालय, द्वारा महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, उमरेड रोड, नागपूर-९
१५.	जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१६.	निवड नस्ती.